**पीएम गतिशक्ती नॅशनल मास्टर प्लॅन या उपक्रमांतर्गत पणन विभागाची माहिती BISAG-N या GIS पोर्टलवर अपलोड करण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,**
शासन निर्णय क्र. संकीर्ण-०३२५/प्र.क्र.२२/१-स
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय,मुंबई ४०००३२.
दिनांक:- १९ मार्च, २०२५

**संदर्भ:-**१) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग, क्र. आयडीसी २०२४/ प्र.क्र.१११/ उद्योग-२, दि.१२.०८.२०२४.
२) मा.मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली दि.१०.०२.२०२५ रोजी झालेल्या बैठकीचे इतिवृत्त.
३) मा.मुख्य सचिव कार्यालयाचे क्र.८००४२४९/२०२५/मुसका, दि.०७.०३.२०२५ रोजीचे पत्र.
४) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागाचे पत्र क्र.सववि-३५.२४/प्र.क्र.१८१/आस्था-१, दि.१०.०३.२०२५.

**प्रस्तावना:-**

पीएम गतिशक्ती हा राष्ट्रीय उपक्रम केंद्र सरकारने दि.१३.१०.२०२१ रोजी जाहीर केला आहे. सदर उपक्रम कार्यान्वित करण्यासाठी संस्थात्मक फ्रेमवर्क आणि GIS डेटा आधारीत डिजिटल प्लॅटफॉर्म या दोन प्रमुख घटकांचा समावेश करण्यात आला आहे. केंद्र शासनाच्या विविध मंत्रालयांकडून पायाभूत सुविधा कनेक्टिव्हिटी प्रकल्पांचे नियोजन आणि अंमलबजावणीद्वारे मल्टी-मॉडल कनेक्टिव्हिटीसाठी प्रकल्पांना एकत्रित करण्याच्या उद्देशाने सुरु केलेला पीएम गती शक्ती हा राष्ट्रीय उपक्रम आहे.

सदर प्रकल्पाच्या अनुषंगाने प्रत्येक राज्याने राज्य स्तरावरील माहिती (Data) एकत्रित करुन State Master Plan तयार करुन सदर प्लॅन BISAG-N (Bhaskaracharya National Institute for Space Application & Geo-informatics) या GIS पोर्टल वर भरण्याबाबतच्या सूचना विशेष सचिव (लॉजिस्टीक्स), वाणिज्य व उद्योग मंत्रालय, भारत सरकार यांच्या दि.२१.१२.२०२१ च्या पत्रान्वये देण्यात आल्या आहेत.

पीएम गतीशक्ती नॅशनल मास्टर प्लॅन या केंद्र शासनाच्या महत्वाकांक्षी उपक्रमाकरीता उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभागाच्या संदर्भाधीन दि.१२.०८.२०२४ च्या शासन निर्णयान्वये विविध समित्यांची स्थापना करण्यात आली आहे.

पीएम गतीशक्ती नॅशनल मास्टर प्लॅन या केंद्र शासनाच्या उपक्रमाच्या अनुषंगाने मा.मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली दि.१०.०२.२०२५ रोजीच्या आढावा बैठकीत दिलेल्या निदेशानुसार सर्व विभागांनी त्यांची माहिती पीएम गतीशक्ती पोर्टलवर अपलोड करावयाची आहे. तसेच त्या त्या विभांगानी नोडल ऑफीसरची नियुक्ती करण्याबाबत सूचना देण्यात आल्या आहेत.

पीएम गतिशक्ती पोर्टलवर पायाभूत सुविधांची आणि पायाभूत सुविधांसाठी शासकीय जमिनीचे तसेच नवीन प्रकल्पांसाठी लागणाऱ्या अत्यावश्यक सुविधांचे भू-टॅगिंग प्रदान करण्याच्या अनुषंगाने मा.मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली दि.०५.०३.२०२५ रोजी मंत्रालय येथे आयोजित बैठकीत झालेल्या चर्चेच्या अनुषंगाने मा.मुख्य सचिव कार्यालयाच्या संदर्भाधीन दि.०७.०३.२०२५ रोजीच्या पत्रान्वये सूचना दिलेल्या आहेत.

मा.मुख्य सचिव कार्यालयाच्या सूचनांच्या अनुषंगाने सहकार व पणन विभागाच्या संदर्भाधिन दि.१०.०३.२०२५ रोजीच्या कार्यालयीन आदेशान्वये, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागातील सर्व उपविभागांचे सह सचिव/उप सचिव यांना नोडल अधिकारी म्हणून नियुक्त करण्यात आले असून उप सचिव (पणन) यांची पणन प्रभागाचे “नोडल अधिकारी” म्हणून नियुक्ती करण्यात आली आहे. तसेच पणन विभागाच्या अंतर्गत येणाऱ्या कार्यालयांचे कार्यालय प्रमुख यांची “राज्यस्तरीय नोडल अधिकारी” म्हणून नियुक्ती करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णयः-**

पीएम गतिशक्ती या राष्ट्रीय उपक्रमांतर्गत राज्य स्तरावरील पणन विभागाच्या अधिनस्त कार्यालयांची माहिती MRSAC या संस्थेकडून डिजिटल स्वरुपातील माहिती तयार करुन MRSAC या संस्थेमार्फत BISAG-N या GIS पोर्टलवर भरण्यासाठी पणन विभागाच्या अंतर्गत येणाऱ्या खालील कार्यालयांचे कार्यालय प्रमुख यांची **“राज्यस्तरीय नोडल अधिकारी”** म्हणून नियुक्ती करण्यात येत आहे:-

| अ.क्र. | पदनाम | कार्यालयाचे नाव |
|---|---|---|
| १ | अध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक | महाराष्ट्र राज्य वखार महामंडळ, पुणे. |
| २ | व्यवस्थापकीय संचालक | महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ, मुंबई. |
| ३ | व्यवस्थापकीय संचालक | महाराष्ट्र राज्य सहकारी कापूस उत्पादक पणन महासंघ मर्या., मुंबई. |
| ४ | पणन संचालक | पणन संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे. |
| ५ | कार्यकारी संचालक | महाराष्ट्र राज्य कृषि मंडळ, पुणे. |

२. उपरोक्त “राज्यस्तरीय नोडल अधिकारी” यांनी त्यांच्या कार्यालयांतर्गत येणाऱ्या प्रादेशिक विभागीय स्तरावरील अधिकारी आणि जिल्हास्तरीय अधिकारी यांना अनुक्रमे “विभागीय स्तरावरील नोडल अधिकारी” व “जिल्हास्तरीय नोडल अधिकारी” म्हणून नियुक्तीबाबतचे आदेश निर्गमित करावेत.

३. राज्यस्तरीय नोडल अधिकारी यांनी त्यांच्या कार्यालयांतर्गत येणाऱ्या योजना/प्रकल्प यांची डिजिटल स्वरुपातील माहिती MRSAC या संस्थेकडून तयार करुन MRSAC या संस्थेमार्फत BISAG-N या GIS पोर्टलवर भरण्याकरीता पोर्टलवरती लॉगिन करण्यासाठी संबंधित अधिकारी/ कर्मचारी यांना प्राधिकृत करुन लॉगिन करण्यासाठी खालीलप्रमाणे माहिती

pmgatishakti@midcindia.org या ईमेल वर पाठवून संबंधित अधिकारी/कर्मचारी यांचे लॉगिन आयडी व पासवर्ड प्राप्त करुन घ्यावेत.

| अ.क्र. | तपशील |
|---|---|
| १ | नाव |
| २ | पदनाम |
| ३ | कार्यालयीन ई-मेल (NIC ई-मेल) |
| ४ | मोबाईल क्रमांक |

४. "विभागीय स्तरावरील नोडल अधिकारी" व "जिल्हास्तरीय नोडल अधिकारी" यांनी BISAG-N या GIS पोर्टलचा लॉगिन आयडी व पासवर्ड प्राप्त असलेल्या संबंधित अधिकारी/कर्मचारी यांचेमार्फत त्या-त्या कार्यालयांची डिजिटल स्वरुपात माहिती MRSAC या संस्थेकडून तयार करुन योग्य त्या फॉर्मेटमध्ये BISAG-N या GIS पोर्टलवर अपलोड करण्याबाबतची पुढील आवश्यक ती कार्यवाही करावी.

५. पीएम गतिशक्ती या राष्ट्रीय उपक्रमांतर्गत विभागाची माहिती BISAG-N या GIS पोर्टलवर भरणे व अद्ययावत करणे याबाबत मंत्रालयीन विभाग स्तरावर वेळोवेळी आढावा घेण्यात येईल.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२५०३१९१११११४६९३०२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SANTOSH DNYANDEO DESHMUKH

Digitally signed by SANTOSH DNYANDEO DESHMUKH
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=CO-OPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, 2.5.4.20=9652b1a97746d93924d97e059e2acb2aa9b6ef9c2644ab23e6c801f3e656b5ad, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=17757CD30ED5F82FA2A50F777CBE634900B7D3EBCB60660E708648C95D8488B7, cn=SANTOSH DNYANDEO DESHMUKH
Date: 2025.03.19 11:12:45 +05'30'

**(संतोष देशमुख)**
**उप सचिव (पणन), महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) अध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य वखार महामंडळ, पुणे.
२) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ, मुंबई.
३) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी कापूस उत्पादक पणन महासंघ मर्या., मुंबई.
४) पणन संचालक, पणन संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
५) कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य कृषि मंडळ, पुणे.
६) उप सचिव (आस्था), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
७) अवर सचिव/कक्ष अधिकारी(१०-स,११-स,२१-स व २४-स) (पणन विभाग), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
८) निवडनस्ती/१-स.